शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना संगणकाचे खाजगी संस्थांकडून प्रशिक्षण घेतल्याबाबत खर्चाची प्रतिपूर्ती करणे तसेच याबाबत प्रोत्साहनासाठी रोख रक्कम मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय,क्रमांक-सीओएम-१०९८/प्र.क्र.२९/९८/३९,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- २४ मार्च,१९९८.

शासन निर्णय

शासकीय कामकाजाचे दोन वर्षाच्या आत संगणकीकरण करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. हे संगणकीकरण कालबध्द पध्दतीने करावयाचे आहे. शासनाच्या कामकाजात संगणकाचा प्रभावीपणे व परिणामकारकपणे वापर करण्यामागे मुख्य अडचण आहे ती म्हणजे प्रशिक्षित अधिकारी व कर्मचारीवृंदाची. संगणक यंत्रसामग्री घेण्यात आली तर त्या यंत्रसामग्रीचा परिणामकारकपणे वापर करण्यासाठी शासनाच्या विविध स्तरावर प्रशिक्षित अधिकारी/कर्मचारी उपलब्ध नसतात. संगणकाचा शासन व्यवहारात पूर्णपणे वापर होण्याच्या दृष्टीने शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना प्रोत्साहन देण्यासाठी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

(१) शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना खाजगी संस्थांमधून संगणकाचे प्रशिक्षण घेण्यास परवानगी देण्यात यावी व त्याबाबतच्या खर्चाची प्रतिपूर्ती, केंद्र शासनाच्या इलेक्ट्रॉनिक्स विभागाने प्राधिकृत केलेल्या संस्थांमार्फत घेण्यात येणा-या परीक्षा, (डीओइएसीसी ''ओ'' लेव्हल परीक्षा अथवा सी-डॅकचा 'डिप्लोमा इन इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी'') उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र सादर केल्यानंतर करण्यात यावी. सदर प्रतिपूर्ती ही रु.५,०००/- (रुपये पाच हजार फक्त) इतक्या रकमेपर्यंत करण्यात यावी.

(२) जे शासकीय अधिकारी/कर्मचारी डीओइएसीसी ''ओ'' लेव्हल व सी-डॅकचा ''डिप्लोमा इन इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी'' या परीक्षा उत्तीर्ण झाल्याबाबत प्रमाणपत्र सादर करतील अशा अधिकारी/कर्मचारी यांना खालीलप्रमाणे रोख रक्कम प्रोत्साहन म्हणून मंजूर करण्यात यावी :-

(अ) डीओइएसीसी यांची ''ओ'' लेव्हल परीक्षा अथवा सी-डॅकची ''डिप्लोमा इन इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी'' परीक्षा उत्तीर्ण झाल्यास रु.२,५००/- (रुपये दोन हजार पाचशे फक्त).

(ब) डीओइएसीसी ची ''ए'' प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण झाल्यास अथवा सी-डॅकची 'ॲडव्हान्स इन इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी' परीक्षा उत्तीर्ण झाल्यास रु.५,०००/- (रुपये पाच हजार फक्त)

(३) संबंधित विभागांनी उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च हा आपल्या प्रधान लेखा शीर्षाखालील ''कार्यालयीन खर्च'' या उप शीर्षाखाली 'संगणकाकरिता खर्च' या गौण शीर्षाअंतर्गत त्या त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून करावा. यासाठी अंदाजपत्रकीय तरतूद करण्याची कार्यवाही वेळेवर करावी.

(कृ.मा.प.

एच-1200(1,000-2-99) GR-200204121151118000-0104

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ कमांक : सीआर-४४२/व्यय-४, दिनांक ७ मार्च,१९९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

राधेश्याम मोपलवार
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
• प्रबंधक, उच्च न्यायालय,मूळ शाखा,मुंबई,
• प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
• प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
• सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
• सचिव, महाराष्ट्रविधानमंडळ सचिवालय (विधानसभा),मुंबई,
• सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद),मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,/लेखाकोष भवन, बांद्रे (पूर्व), मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (दोन प्रती).

• (पत्राने) GR-20020412115118000-0104

-------

एच-1200(1,000-2-99)अ